थकित खाचमेळाचे काम पूर्ण करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग,
परिपत्रक क्रमांक खाचमे 1092/प्र.क्र. 111/92/लेपनि,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 19 जून 1992.

वाचा:- परिपत्रक क्र.वि.वि. अेयुडी 1082/सीआर 90/84/कोष-5, दिनांक 24 सप्टेंबर 1986.

## परिपत्रक

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-1, मुंबई यांनी शासनाच्या असे निदर्शनास आणले आहे की, ब-याच प्रशासनिक विभागांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील पहिल्या तिमाही पासूनची खाचमेळाची कामे प्रलंबित आहेत. काही कार्यालयांची खाचमेळ करणारी पथके महालेखापालांच्या कार्यालयात जाऊन खाचमेळाचे काम पूर्ण करीत असतात. परंतु महालेखापाल यांच्या कार्यालयातील अधिका-यांकडून खाचमेळाचे काम पूर्ण केल्याबाबतची प्रमाणपत्रे घेण्याबाबत जागरुकता दाखवित नाहीत. त्यामुळे महालेखापालांच्या कार्यालयाकडून पहिल्या तिमाहीपासूनचे खाचमेळ थकित असल्याची विवरणपत्रे वित्त विभागाकडे परिपूर्णता करून घेण्यासाठी पाठविली जातात.

2. खाचमेळ करण्या संदर्भातील महालेखापालांनी निदर्शनास आणून दिलेल्या उपरोक्त बाबी उद्‌भवू नयेत म्हणून सर्व प्रशासकीय विभाग, नियंत्रक अधिकारी, आहरण व संवितरण अधिकारी यांनी त्यांच्या विभागाचे/कार्यालयाचे नियंत्रणाखालील थकीत खाचमेळाचे काम विहित कालावधीत पूर्ण करण्याबाबत दक्षता घ्यावी. या संदर्भात शासन परिपत्रक क्र.वि.वि.एयुडी 1082/सीआर 90/84/कोषा-5, दिनांक 24 सप्टेंबर 1986 मधील सूचना लक्षात घेण्यात याव्यात. तसेच, महालेखापालांकडून संबंधित कार्यालयाचे खाचमेळाचे काम पूर्ण केल्याबाबतची प्रमाणपत्रे घेण्याची खबरदारी घेण्यात यावी.

3. वरील सूचनांचे कटाक्षाने पालन करण्यात यावे. खाचमेळाचे काम विहित कालावधीत पूर्ण न झाल्यास संबंधित कार्यालय प्रमुख/नियंत्रक अधिकारी/आहरण व संवितरण अधिकारी यांना व्यक्तिशः जबाबदार धरले जाईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

भि. रा. उके,
अवर सचिव, वित्त विभाग.

प्रति

सर्व विभागीय आयुक्त,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
महालेखापाल, महाराष्ट्र-1, मुंबई (लेखा व अनुज्ञेयता),
महालेखापाल, महाराष्ट्र-1, मुंबई (लेखा परीक्षा),
महालेखापाल, महाराष्ट्र-2, नागपूर (लेखा व अनुज्ञेयता),
महालेखापाल, महाराष्ट्र-2, नागपूर (लेखा परीक्षा),
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य, कोकण भवन, नवीन मुंबई,

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

निवासी लेखा अधिकारी, मुंबई,

उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,

सर्व मंत्री, राज्यमंत्री आणि उप मंत्री यांचे स्वीय सहाय्यक,

महाराष्ट्रातील सर्व विभाग/कार्यालय प्रमुख,

× प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,

× प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,

× प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

× सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

× सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

मंत्रालयाचे सर्व विभाग,

सर्व कोषागार अधिकारी,

सर्व उप कोषागार अधिकारी,

उप संचालक, लेखा व कोषागारे, पुणे/नागपूर/नाशिक/औरंगाबाद,

वित्त विभागातील सर्व प्रशासन कार्यासने,

निवड नस्ती, वित्त विभाग, लेपवि.

× पत्राने.